**अकृषि विद्यापीठातील शिक्षक - शिक्षकेत्तर कर्मचारी तसेच अशासकीय अनुदानीत/विना अनुदानीत महाविद्यालयांतील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचा-यांना धारणाधिकार मंजूरीबाबत.**

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक:नियुक्ती-२०१०/(प्र.क्र.३३७/२०१०)/म.शि.५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३/०८/२०१०

**प्रस्तावना:-** राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठाच्या परिनियमामध्ये शिक्षक-शिक्षकेत्तर कर्मचा-यांसाठी धारणाधिकार मंजूरीबाबत व धारणाधिकाराच्या कालावधीबाबत विद्यापीठनिहाय वेगवेगळ्या तरतूदी आहेत. त्यामुळे एका विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रातील कर्मचा-याने दुस-या विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रामध्ये नियुक्ती स्विकारल्यास विद्यापीठनिहाय तरतूदी वेगवेगळ्या असल्यामुळे धारणाधिकार मंजूर करण्यामध्ये अडचणी निर्माण होत होत्या. तर काही विद्यापीठाच्या परिनियमामध्ये धारणाधिकाराची केवळ व्याख्या करण्यात आली असल्यामुळे धारणाधिकार किती कालावधीकरिता मंजूर करावा याबाबत संभ्रम निर्माण होत होता. त्यामुळे अकृषि विद्यापीठाबरोबरच अनुदानीत / विना अनुदानीत महाविद्यालयांच्या शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचा-यांसासाठी धारणाधिकाराबाबत एकसूत्रता असावी ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच धारणाधिकाराचे कालावधीत धारणाधिकार प्राप्त कर्मचा-यांच्या पदावर कोणत्या स्वरुपात नियुक्ती करावी ही बाबसुध्दा शासनाच्या विचाराधीन होती. राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठाच्या शिक्षक-शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांसाठी तसेच अनुदानीत / विना अनुदानीत महाविद्यालयांच्या शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचा-यांसासाठी धारणाधिकार मंजूर करण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१) विद्यापीठातील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचा-यांसाठी धारणाधिकार मंजूर करण्याबाबतचे अधिकार कुलगुरुंना राहतील.

२) अशासकीय अनुदानीत व विनाअनुदानीत महाविद्यालयांसाठी धारणाधिकार मंजूर करण्याचे अधिकार संबंधित संस्थांच्या व्यवस्थापनाकडे राहतील.

३) धारणाधिकार जास्तीत जास्त दोन वर्षासाठी मंजूर करता येईल. मात्र विद्यापीठ कायद्यातील वैधानिक पदावर नियुक्ती झाल्यास, त्या बाबतीत ५ वर्षासाठी धारणाधिकार मंजूर करता येईल. त्यानंतर तो आपोआप संपुष्टात येईल.

४) धारणाधिकार प्राप्त होण्यासाठी पुढे नमूद केलेल्या अटी/शर्तींची पूर्तता होणे आवश्यक राहील.

अ) शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचा-यांने निर्बंध रिक्त पदावर (on clear post) सेवा केली असली पाहिजे.

ब) शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी सेवेमध्ये नियमित असले पाहिजे.

क) शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचा-यांची नियुक्ती विहीत मार्गाने झाली असली पाहिजे.

ड) विद्यापीठ अनुदान आयोगाने निदेशित केलेली विहीत शैक्षणिक अर्हता धारण केली असली पाहिजे.

इ) किमान ५ वर्षाची सेवा झाली असली पाहिजे.

५) धारणाधिकार मंजूर केलेल्या पदावर पुढीलप्रमाणे नियुक्ती करण्यात यावी.

अ) धारणाधिकार मंजूर केलेल्या पदावर विद्यापीठ व शासनाने विहीत केलेल्या नियमानुसार अर्हता व सर्व कार्यपध्दतीचा अवलंब करुन विद्यापीठाने विहीत केलेल्या निवडसमितीमार्फत निवड झालेल्या उमेदवारांमधून नियुक्ती करावी.

ब) सदर नियुक्ती ही केवळ धारणाधिकार कालावधीपुरतीच मर्यादित राहील असा स्पष्ट उल्लेख नियुक्ती आदेशात करण्यात यावा. कोणत्याही परिस्थितीत सदर नियुक्ती कायम करण्यात येऊ नये अन्यथा संबंधित अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल.

क) सदर नियुक्ती ही नियमित वेतनश्रेणीतील मूळ वेतन व त्या अनुषंगाने येणारे एकत्रित वेतनावर राहील व त्यास कोणतीही वेतनवाढ अनुज्ञेय असणार नाही.

६) वरीलप्रमाणे नियुक्ती न केल्यास सदर पदावरील अनुदान अनुज्ञेय असणार नाही.

हे आदेश शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सदाशिव शिवदास)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

त:

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई.
२) सर्व कुलगुरु अकृषि विद्यापीठे.
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
४) मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
५) मा. मंत्री (उ.व तं.शि. वि.) यांचे खाजगी सचिव.
६) मा. राज्यमंत्री (उ.व तं.शि. वि.) यांचे खाजगी सचिव.
७) मा. मुख्य सचिव.
८) सर्व कुल सचिव, अकृषि विद्यापीठे,
९) सर्व संचालक व विद्यापीठ व महाविद्यालय विकास मंडळ,
१०) मा. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
११) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व सह संचालक, उच्च शिक्षण,
१३) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.
१४) म.शि.५ कार्यासन, निवडनस्ती.